महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ, कृषि सहसंचालक संवर्गातून, महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ, कृषि संचालक संवर्गात निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीबाबत.....
निवडसूची सन २०२४-२५

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांक: आकृवि-२४२५/प्र.क्र.०८/१५अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: २८ फेब्रुवारी, २०२५.

**संदर्भ**:-१)सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६ब, दि.०७.०५.२०२१,
२)सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र.ईएसबी-११२५/प्र.क्र.१८/आस्थामं(का.१३), दि.२४/०२/२०२५
३)कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक: आकृवि-२४२४/प्र.क्र.६५/१५अे, दि.३०.०८.२०२४
४)कृषि व पदुम विभाग शासन आदेश क्रमांक: आकृवि-२४२४/प्र.क्र.६५/१५अे, दि.१४.१०.२०२४

**शासन आदेश :-**

सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये केलेल्या शिफारशीनूसार, महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ, कृषि सहसंचालक (वेतनश्रेणी एस-२५ : रु.७८८००-२०९२००) संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ कृषि संचालक (वेतनश्रेणी एस-२९ : १३११००-२१६६००) या संवर्गात सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टिने निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीने खालीलप्रमाणे पदस्थापना करण्यास या शासन आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे:-

| अ. क्र. | ज्ये. क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | श्री. अशोक हनमंतअप्पा किरनळ्ळी,<br>संचालक (आत्मा), पुणे | खुला | संचालक (आत्मा), पुणे | श्री.किरनळ्ळी यांची दिनांक १४.१०.२०२४ च्या शासन आदेशान्वये कृषि संचालक संवर्गातील श्रेणी अवनत केलेल्या संचालक (आत्मा), पुणे या पदावर तात्पुरती नियुक्ती करण्यात आली होती. श्री.किरनळ्ळी यांना सदर पद श्रेणीउन्नत करुन पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे. |

| अ. क्र. | ज्ये. क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| २ | ३ | श्री.किसन शामराव मुळे, संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन व औषधी वनस्पती मंडळ, पुणे | खुला | संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन व औषधी वनस्पती मंडळ, पुणे | श्री.मुळे यांची दिनांक १४.१०.२०२४ च्या शासन आदेशान्वये कृषि संचालक संवर्गातील श्रेणी अवनत केलेल्या संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन व औषधी वनस्पती मंडळ, पुणे या पदावर तात्पुरती नियुक्ती करण्यात आली होती. श्री.मुळे यांना सदर पद श्रेणीउन्नत करुन पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे. |
| ३ | ५ | श्री. अंकुश मारुती माने, विभागीय कृषि सह संचालक, ठाणे | खुला | संचालक, महाराष्ट्र राज्य बीज प्रमाणिकरण यंत्रणा, अकोला | रिक्त पदी |

२. उपरोक्त तात्पुरती पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

**(अ)** सदर तात्पुरती पदोन्नती ही मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने, मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या व प्रलंबित असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील निर्णयास अधीन राहून आणि सा.प्र.वि./१६ब कार्यासनाच्या दि.७/५/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात रिक्त असलेल्या पदांवर ज्येष्ठतेने देण्यात येत आहेत.

**(ब)** सदर तात्पुरती पदोन्नती ही मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या रिट पिटीशन स्टँप नं.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टँप नं.१०८७८/२०२१ मध्ये मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.२५.५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

**(क)** सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्यामुळे पदोन्नतीच्या दिनांकापासून सेवाज्येष्ठतेचा हक्क सांगता येणार नाही.

**(ड)** संबंधित अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ, कृषि सहसंचालक पदावरील तात्पुरती पदोन्नती नाकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२/९/२०१६, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/का.१२, दि.१/८/२०१९ मधील तरतुदीनुसार संबंधित अधिकाऱ्यांचे नाव, सन २०२४-२५ च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल आणि पुढील दोन वर्षी (सन २०२५-२६ व २०२६-२७) होणाऱ्या निवडसूचीमध्ये त्यांचा नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत

(सन २०२७-२८), महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ कृषि संचालक पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

**(इ)** सदर अधिकाऱ्यांची महाराष्ट्र कृषि सेवा, गट-अ कृषि संचालक पदावरील तात्पुरती पदोन्नती ही सदर अधिकाऱ्यांविरुध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही.

**(इ)** उपरोक्त अधिकाऱ्यांनी त्यांचा सध्याचा पदाचा पदभार विभागातील निकटतम ज्येष्ठ अधिकाऱ्यांकडे सोपवून तात्काळ पदोन्नतीच्या पदावर रूजू व्हावे. तसेच, पुढील बाबही निदर्शनास आणण्यात येते की, सामान्य प्रशासन विभागाच्या शासन अधिसूचना दि.२१/६/२०२१ मधील तरतुदीनुसार संबंधित अधिकाऱ्यांनी सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसात पदोन्नतीच्या पदावर रूजू होणे आवश्यक आहे.

३. वरील अधिकाऱ्यांची परस्पर सेवाज्येष्ठता सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन क्र.२ येथे नमूद पत्रान्वये कळविण्यात आलेल्या इतिवृत्तातील सन २०२४-२५ च्या निवडसूचीला दिलेल्या मान्यतेनुसार राहील.

४. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

५. सदर आदेश सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२८१४२७१००००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAFULL
JAYARAJ THAKUR

Digitally signed by PRAFULL JAYARAJ THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=a667c77bb88ce063662f2aa699e2500c4762f460cf24044d9294538ae9317866, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=270161C25173749823DF5244F6DD301BD627572B61CB43E0B30429B8BA527568, cn=PRAFULL JAYARAJ THAKUR
Date: 2025.02.28 14:28:58 +05'30'

**( प्रफुल्ल ठाकूर )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा)१/२ महाराष्ट्र मुंबई /नागपूर.
५) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) सर्व कृषि संचालक, व्दारा आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे.
७) सहसंचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) सर्व कृषि सहसंचालक/सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी व्दारा कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे. (द्वारा-आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे)

१०) संबंधित अधिकारी, व्दारा आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

११) निवडनस्ती १५ अे.

*********